**राज्यसेवा परिक्षा-२०१४- एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी-२) - प्रशिक्षणास रुजू होण्यासाठी द्यावयाच्या मुदतवाढीबाबतचे निकष ...**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-०४१५/ प्र.क्र. ४७ /१५/१८-ब**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २४ एप्रिल, २०१५.

वाचा :

- शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग़ क्र. टिआरएन-२०१३/ प्र.क्र. ८४/१३/१२-अ, दिनांक २०.१.२०१४.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सरळसेवेने गट-अ आणि गट-ब मध्ये नियुक्त होणा-या विविध १९ संवर्गातील अधिका-यांचा एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमार्फत सुरु करण्याबाबतचा निर्णय शासनाने उपरोक्त शासन निर्णयान्वये घेतलेला आहे. राज्यसेवा परीक्षा-२०१४ च्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या गट अ व गट-ब मधील सन २०१५ च्या तुकडीतील विविध संवर्गातील शिफारसप्राप्त उमेदवारांचे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण दिनांक २.५.२०१५ पासून अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर येथे सुरु करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

२. सन २०१५ च्या तुकडीतील गट-अ व गट-ब मधील शिफारसप्राप्त उमेदवारांचे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण दिनांक २.५.२०१५ पासून सुरु करण्याचा शासनाने निर्णय घेतल्यानंतर प्रशिक्षणास हजर होण्यासाठी मुदतवाढ मिळण्याबाबत शिफारसप्राप्त उमेदवारांकडून शासनास विनंतीअर्ज प्राप्त झाले आहेत.

३. या अर्जांद्वारे काही उमेदवारांनी स्वतःचे लहान मूल/ स्वतःच्या प्रकृतीचे कारण/ कुटूंबातील सदस्याच्या प्रकृतीचे कारण/ राज्यसेवा- केंद्रीय लोकसेवा आयोगाच्या परीक्षेची तयारी/ वैयक्तिक कारण इत्यादी कारणास्तव रुजू होण्यासाठी १ वर्षाची मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे. उमेदवारांच्या अशा विनंतीवर शासनाने विचार विनिमय केला असून यासंदर्भात पुढील निर्णय घेतला आहे :-

१. शिफारसप्राप्त महिलांना, त्यांनी वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीवर, प्रसुतीसाठी एक वर्ष मुदतवाढ देण्यात यावी.

२. १ वर्षाच्या आतील मुलाच्या संगोपनासाठी एक वर्ष मुदतवाढ देण्यात यावी.

३. शिफारसप्राप्त उमेदवाराच्या गंभीर आजाराच्या कारणास्तव, जसे अपघात, प्रकरणपरत्वे निर्णय घेण्यात यावा.

४. राज्यसेवा परीक्षा-२०१४ च्या आधारे गट-ब मधील पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवाराकडून परीक्षेस बसण्याच्या कारणास्तव प्रशिक्षणास रुजू होण्यासाठी १ वर्ष मुदतवाढ देण्याची विनंती प्राप्त झाल्यानंतर अशा उमेदवारांना पुढील वर्षी प्रशिक्षणास रुजू होण्याची अनुमती देण्यात यावी.

५. राज्यसेवा परीक्षा-२०१४ च्या आधारे गट-अ किंवा गट-ब मधील पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांपैकी केंद्रिय लोकसेवा आयोगाची पूर्वपरीक्षा उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांकडून मुदतवाढीची विनंती करण्यात आल्यास अशा उमेदवारांना देखील पुढील वर्षी प्रशिक्षणास रुजू होण्याची अनुमती देण्यात यावी.

६. कोणत्याही परिस्थितीत एक वर्षापेक्षा जास्त मुदतवाढ देण्यात येऊ नये.

७. वरील निकषाच्या आधारे मुदतवाढ प्राप्त केलेला उमेदवार सन २०१५ च्या तुकडीतील त्याची संवर्गातील जेष्ठता गमावेल. अशा उमेदवाराची जेष्ठता पुढील तुकडीतील त्या संवर्गातील उमेदवारांच्या सुरुवातीस राहील.

८. या व्यतिरिक्त अन्य कोणत्याही कारणास्तव केलेली मुदतवाढीची विनंती फेटाळण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०४२४१२३०३२६५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.04.24 12:45:31 +05'30'

**( डॉ. भगवान सहाय )**

अपर मुख्य सचिव (सेवा)

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई - ३२,

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

४. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,

५. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),

७. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,

८. सहसचिव(अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

९. उप सचिव (व्यय ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०.निवडनस्ती कार्यासन १८-ब/ १२-अ.